**छात्रपूर्व प्रशिक्षण केंद्र, नाशिक येथील भोजन ठेकेदाराच्या जेवणाच्या दरात वाढ करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः २०१२/१२६१/(प्र.क्र.४५६/१२)/२८**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
तारीख : ११ डिसेंबर, २०१४.

**वाचा :**

१) शासन निर्णय क्रमांक : शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र.सैकवि-१०९८/१७८४/प्र.क्र.४६/९९/२८, दिनांक ०३/०६/१९९९.

२) शासन निर्णय क्रमांक : संचालक, सैनिक कल्याण विभाग, पुणे यांचे अनुक्रमे १) क्र.१९००८/सैकवि-१९, दि.१३/०८/२०१२, २) क्र.१९००८/सैकवि-१९, दि.०२/११/२०१२, ३) क्र.१९०० /सैकवि-१९, दि. २२/०५/२०१३ व ४) क्र. १९००८/सैकवि-१९(i), दि. २४/०९ /२०१३ ची पत्रे.

**प्रस्तावना :**

भारतीय सैन्य दलांत अधिकारी पदावर महाराष्ट्रीय मुले व मुली जादा संख्येने भरती व्हावीत या उद्देशाने, छात्रपूर्व प्रशिक्षण केंद्र, नाशिक येथे वर्षभरात साधारणत: (१) प्रत्येकी ७५ दिवसांचे दरवर्षी २ सी.डी.एस. (Combined Defense Services) व (२) प्रत्येकी १० दिवसांचे ४ एस.एस.बी. (Service Selection Board) या परीक्षा/मुलाखतीकरिता तज्ञांच्या मार्गदर्शनाखाली प्रशिक्षण वर्ग चालविण्यात येतात. सदर केंद्रातील प्रशिक्षणांर्थीना दरडोई रुपये ३०/- या दराने भोजन कंत्राटदारास ठेका देण्यास शासन निर्णय, दिनांक ०३.०६.१९९९ अन्वये मंजूरी देण्यात आली होती. त्यानुसार या दरात भोजन पुरवणेसाठी भोजन ठेकेदाराची दरवर्षी नियुक्ती करावी लागते. तथापि, दरम्यानच्या काळात जीवानावश्यक वस्तुंसह भोजनाशी संबंधित सर्वच वस्तुंच्या किंमतींमध्ये भरीव वाढ झालेली असल्याने सद्य:स्थितीत रुपये ३०/- दरडोई, या अल्प दरात भोजन ठेकेदार, ठेका घेण्यास तयार होत नाहीत. सदर पार्श्वभूमी लक्षात घेता छात्रपूर्व प्रशिक्षण केंद्र, नाशिक या केंद्रातील प्रशिक्षणार्थ्यांच्या दरडोई भोजन ठेक्याचा दर वाढविण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधिन होता. या अनुषंगाने शासनाने आता खालीलप्रमाणे निर्णय घेतलेला आहे,

**शासन निर्णय :**

छात्रपूर्व प्रशिक्षण केंद्र, नाशिक या केंद्रातील प्रत्येक प्रशिक्षण कार्यक्रमाच्या प्रकारानुसार व विहित कालावधीनुसार प्रशिक्षणार्थ्यांवरील जेवण व नास्ता इत्यादीवरील खर्चासाठी मंजूर करण्यात आलेला भोजन ठेक्याचा दर रुपये १००/- (रुपये शंभर फक्त) प्रतिदिन/प्रति प्रशिक्षणार्थी इतका करण्यास शासन सोबतच्या परिशिष्ट "अ" मधील नियम व अटी यांच्या तसेच परिशिष्ट "ब" मध्ये विहित केल्यानुसार चौरस आहार/नाश्ता पुरविण्याबाबतच्या पूर्ततेच्या अधिन राहून शासन मान्यता देण्यात येत आहे. सदर सुधारीत दर हे हा शासन निर्णय निर्गमित केल्याच्या तारखेपासून लागू राहतील.

२. सदर अनुदान " मागणी क्र. ए - ५, लेखाशीर्ष २२३५, सामाजिक सुरक्षा व कल्याण, ६०-इतर सामाजिक सुरक्षा व कल्याण कार्यक्रम, २००-इतर कार्यक्रम, (००)(०१) छात्रपूर्व प्रशिक्षण योजना-१९ आहार खर्च (२२३५ ००३ ३)" या लेखाशीर्षाखाली मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

३. संचालक, सैनिक कल्याण विभाग, पुणे यांना याबाबतीत "आहरण व संवितरण अधिकारी" म्हणून घोषित करण्यात येत आहे.

४. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.अनौसं-१०५०/१४/व्यय-४, दिनांक ०९/१२/२०१४ अन्वये दिलेल्या सहमतीस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४१२१११६०१४६५७०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sanjay Pandurang Musale

Digitally signed by Sanjay Pandurang Musale
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=General Administration Dept, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Sanjay Pandurang Musale
Date: 2014.12.11 16:09:40 +05'30'

**(सं.पां. मुसळे)**
कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव,
२. मा. मुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
३. मा.राज्यमंत्री (मासैक) यांचे स्वीय सहाय्यक ,
४. प्र. सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई (शाखा ड-५/ड-६)(२ प्रती),
५. महालेखापाल (लेखा परीक्षा)-१/२ महाराष्ट्र, मुंबई/नागपूर,
६. महालेखापाल (लेखा व आज्ञेयता)-१/२ महाराष्ट्र, मुंबई/नागपूर,
७. महालेखापाल (स्थानिक निकाय लेखा परीक्षा व लेखा) महाराष्ट्र, मुंबई - ३२
८. कमांडर, महाराष्ट्र-गुजरात एरिया मुख्यालय, कुलाबा, मुंबई ४०० ००५,
९. सर्व जिल्हाधिकारी,
१०. सर्व कोषागार अधिकारी,
११. संचालक, सैनिक कल्याण विभाग, पुणे ४११ ००६ (५ प्रती),
१२. सर्व जिल्हा सैनिक कल्याण अधिकारी,
१३. सह संचालक, लेखा व कोषागार, संगणक कक्ष, ५ वा मजला, नवीन प्रशासान भवन, मुंबई ३२,

१४. महासंचालक, माहिती व जानसंपर्क महासंचालनालय, मुंबई,

१५. वित्त विभाग (व्यय ४), मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,

१६. सामान्य प्रशासन विभाग (कार्या २५), मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,

१७. निवड नस्ती (२ प्रती).

(सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र. सैकवि-२०१२/१२६१/(प्र.क्र.४५६/१२)/२८, दिनांक ११/१२/२०१४ चे सहपत्र)

## जोडपत्र : परिशिष्ट अ

१) ठेका कालावधीत भोजनाचा दर्जा सातत्याने राखण्यात यावा व तो उत्तम असल्यासच भोजन ठेका कायम ठेवण्यात येईल.

२) अनामत रक्कम म्हणून ठेकदारास रु १०,०००/- (दहा हजार) तातडीने चलनाने जमा करावे लागतील.

३) प्राधिकृत केलेल्या अधिकारी/कर्मचाऱ्यांच्या अचानक तपासणीमध्ये भोजनाचा दर्जा निकृष्ट आढळल्यास कोणतेही कारण न देता भोजन कंत्राट रद्द केले जाईल.

४) ठेकेदारास रु. १००/- किंमतीच्या बॉंड पेपरवर करारनामा लिहून द्यावा लागेल.

५) करारनाम्यातील सर्व नियम व अटी ठेकेदारास बंधनकारक राहतील.

६) छात्रपूर्व प्रशिक्षण केंद्र, नाशिक च्या प्रत्येक प्रशिक्षण वर्गाची प्रशिक्षणार्थ्यांची क्षमता ५० (जास्तीत जास्त) आहे. तथापी, प्रत्यक्षात प्रत्येक कार्यक्रमातील प्रशिक्षणार्थ्यांनी घेतलेल्या व प्रशिक्षणास निश्चितपणे उपस्थित रहाण्याचा प्रवेशसंख्येच्या अनुषंगाने दरडोई, दरमहा/दरदिवशी जी रक्कम ठेकेदारास अनुज्ञेय ठरते ती रक्कम प्रत्येक प्रशिक्षण कार्यक्रमानुसार प्रभारी अधिकारी छात्रपूर्व प्रशिक्षण केंद्र, नाशिक यांनी निश्चित करुन ती ठेकेदारास आगावू कळविणे आवश्यक राहिल व त्याबाबत त्वरेने शासनास व सैनिक कल्याण विभागास अवगत करण्यात येईल.

७) ठेकेदारास स्वयंपाक घरातील त्यांचे सर्व कामगारांची वैद्यकीय तपासणी करुन तसा वैद्यकीय दृष्ट्या पात्रतेचा दाखला सादर करावा लागेल.

८) संचालक, सैनिक कल्याण विभाग, पुणे व प्रभारी अधिकारी, छात्रपूर्व प्रशिक्षण केंद्र, नाशिक यांनी काही प्रसंगी काही शासनमान्य नियम व अटी सुचविल्यास त्या ठेकेदारास बंधनकारक राहतील.

९) ठेकेदार वा त्यांचे कर्मचारी यांचेकडून कोणतेही नुकसान झाल्यास किंवा काही गैर कृत्य घडले तर करारनाम्यातील नियम व अटी नुसार त्यांच्या नुकसानीची भरपाई करुन घेण्याचे अधिकार संचालक सैनिक कल्याण विभाग, पुणे व प्रभारी अधिकारी, छात्रपूर्व प्रशिक्षण केंद्र, नाशिक यांना राहील.

१०) प्रभारी अधिकारी यांचे पूर्व परवानगीशिवाय बाहय भोजनार्थीची भोजन व्यवस्था करुन नये.

११) कंत्राट कालावधीत प्रशिक्षणार्थींना पुरेसे, योग्य, स्वच्छ व उत्तम दर्जाचे अन्न पदार्थ देऊन, ठेकेदाराने भोजन व्यवस्था कायम चोख ठेवावयाची आहे. प्रशिक्षणार्थींना वेळेत भोजन, चहा व

नाश्ता पुरवण्याची ठेकेदाराची जबाबदारी राहील. तसेच साप्ताहीक भोजन मेनू आराखडयानुसार जेवण देणे ठेकेदारास बंधनकारक राहील. त्या मध्ये काही बदल करावयाचे असल्यास ठेकेदारास प्रभारी अधिकारी, छात्रपूर्व प्रशिक्षण केंद्र, नाशिक यांची पुर्व परवानगी घेणे बंधनकारक राहील.

१२) नियमानुसार भोजन खर्चाचे देयकातून आयकर वसुल करुन शासनास जमा करण्यात येईल.

१३) ठेका कालावधीत ठेकेदाराने प्रशिक्षणार्थी बरोबर भोजनाव्यतिरिक्त कार्यालयीन कामाबाबत कोणताही संबंध ठेऊ नये अथवा चर्चा करु नये. सबब कार्यालयीन कामकाजामध्ये कुठल्याही प्रकारे व्यत्यय निर्माण होणार नाही, याची दक्षता ठेकेदाराने घ्यावी.

१४) दररोजच्या भोजनाच्या वेळी तपासणीसाठी टेस्टींग प्लेट प्रभारी अधिकारी यास (वा त्यांच्या वतीने एका छात्रपूर्व प्रशिक्षण केंद्राशी निगडीत संबंधीत वरिष्ठ कर्मचाऱ्यास) ठेवण्यात यावी.

१५) प्रशिक्षणार्थींच्या भोजन हजेरी बाबत ठेकेदाराने दररोज सकाळी कार्यालयीन वेळेत प्रशिक्षणार्थींच्या भोजनाची पूर्तता करुन घेणे गरजेचे आहे. तसेच प्रत्येक भोजनाचे वेळी समक्ष हजर राहणे आवश्यक आहे.

१६) प्रशिक्षणार्थींना दिला जाणारा आहार ठेकेदारास पुरविलेल्या भोजन अराखडयानुसार देण्यात यावा. कोणत्याही परिस्थितीत प्रशिक्षणार्थींना अनारोग्य उत्पन्न करणारे/शिळे जेवण/नाश्ता देऊ नये.

१७) केंद्राने ठेकेदारास वापरासाठी दिलेले साहित्य/वस्तुंची काळजी घेण्याची जबाबदारी ठेकेदाराची असून सामान गहाळ/तुटफुट झाल्यास त्याची भरपाई ठेकेदारास देणे बंधणकारक राहील.

१८) ठेका कालावधी मध्ये भोजन कक्ष, स्वंयपाक गृह स्वच्छ, निटनेटके व अरोग्यदायी ठेवण्याची जबाबदारी ठेकेदाराची राहील.

*****

(सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र. सैकवि-२०१२/१२६१/(प्र.क्र.४५६/१२)/२८, दिनांक ११/१२/२०१४ चे सहपत्र)

## जोडपत्र : परिशिष्ट ब

**भोजन ठेकेदाराने खालील नमूद केल्याप्रमाणे चौरस आहार/नाश्ता पुरवठा करणे अनिवार्य राहील**

| अ.क्र. | चौरस आहार/नाश्ता पुरवठयातील अनिवार्य घटक |
|---|---|
| १. | भोजनात गहू/बाजरी/ज्वारी/तांदुळ (भात)/डाळ/भाजीपाला/कंदभाजी इत्यादी वस्तुंचा पुरवठा पोटभर करण्यात यावा. |
| २. | नाश्त्यासाठी विद्यार्थ्यांना उसळ/पोहे/उपमा/शिरा यापैकी एक, दुध (साखरेसह), उकडलेली २ अंडी दररोज व शाकाहारी मुलांसाठी कॉर्न प्लेक्स (सिरीयेल), प्रत्येक दिवशी एक सफरंचद व ऋतुमानाप्रमाणे मिळणारे एक फळ. |
| ३. | मटन/चिकन दर आठवड्याला ५०० ग्रॅम प्रतिविद्यार्थी याप्रमाणे आठवड्यातून दोनदा, दरवेळी प्रतिविद्यार्थ्यासाठी २५० ग्रॅम प्रमाणे भात/पुलाव, सलाड सह. |
| ४. | शाकाहारी विद्यार्थ्यांसाठी प्रत्येक जेवण्याच्या वेळी २ भाजी, वरण व दही, भात व एक गोडपदार्थ (स्वीट) आठवड्यातून २ वेळा. |
| ५. | दररोज प्रत्येक जेवणात आवश्यक तेवढे कांदा, लिंबू, लोणचे, पापड, सलाड व ५० ग्रॅम गावरान तुप (दर आठवड्यात) |

*****